कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ पदावर श्री. संदिप राऊत यांना सामावून घेण्यास व सदर पदासाठीच्या सेवा प्रवेश नियमांस शासन मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- कडोंम-१०१४/प्र.क्र.२४/नवि-२८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०७ जून, २०२३.

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. कडोंम-१०१४/ प्र.क्र.२४/नवि-२८, दि.२५.०५.२०२२.
२) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ११८, दि.२४.०२.२०२३.
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/साप्र.मुका./प्र.क्र.७५३/No-KDMT/OW/२०२२/७७७, दि.०४.११.२०२२.
४) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/साप्र.मुका./प्र.क्र.७५३/No-KDMT/OW/२०२२/८२३, दि.२४.११.२०२२.
५) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/साप्र.मुका./प्र.क्र.७५३/No-KDMT/OW/२०२३/४२९९, दि.०१.०३.२०२३.

**प्रस्तावना:-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेत आर.सी.एच.-२ कार्यक्रमाच्या प्रोग्राम मॅनेजमेंट युनिटकरिता दि.१७.०७.२०१० च्या आदेशान्वये, दरमहा एकत्रित मानधनावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात करार तत्त्वावर श्री. संदिप राऊत यांची ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ पदावर नियुक्ती करण्यात आली होती. कल्याण-डोंबिवली महानगरपालिका वैद्यकीय आरोग्य विभागासाठी ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ पदाची आवश्यकता असल्याने, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका वैद्यकीय आरोग्य विभागासाठी महानगरपालिकेच्या आस्थापनेवर ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ हे १ पद निर्माण करण्यास संदर्भाधीन दि.२५.०५.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ या पदावर श्री. संदिप राऊत यांना सामावून घेण्याबाबतचा, तसेच, ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ या पदासाठीच्या नेमणूकीच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीची सेवाप्रवेश नियमात तरतूद करण्याबाबत आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचा प्रस्ताव व ठराव शासनास प्राप्त झाला आहे.

**२.** श्री. संदिप राऊत, यांची आर. सी. एच.-२, कार्यक्रमाच्या प्रोग्राम मॅनेजमेंट युनिटकरिता करार तत्त्वावर ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ पदावर केलेली नियुक्ती ही विहित पध्दतीने म्हणजेच जाहिरात, लेखी परीक्षा, मुलाखत, आवश्यक तेथे व्यावसायिक चाचणी, त्यानंतर तज्ञ व अधिकाऱ्यांच्या निवड समितीने केलेली नेमणूक आहे. यास्तव, श्री. संदिप राऊत, यांचे महानगरपालिका सेवेत रिक्त पदावर समायोजन करतांना एकवेळची बाब म्हणून ३५% आस्थापना खर्चाची अट शिथील करण्यास, तसेच, सदर ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ या पदासाठीच्या नेमणूकीच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीची सेवाप्रवेश नियमात तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, दि.२५.०५.२०२२ च्या शासन निर्णयान्वये ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ हे पद मंजूर करण्यात आलेले आहे. त्यानुसार श्री. संदिप राऊत, यांची सन २०१० मध्ये (जाहिरात/लेखी परीक्षा/मुलाखत) या विहीत मार्गाचा अवलंब करून, ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ या पदावर नियुक्ती झालेली असल्याने, त्यांचे ‘सिटी प्रोग्राम मॅनेजर’ या महानगरपालिकेच्या आकृतीबंधात मंजूर रिक्त पदावर

समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम-४५७(३) अनुसार शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या 'सिटी प्रोग्राम मॅनेजर' या पदासाठीच्या नेमणूकीच्या अर्हता/शैक्षणिक अर्हता/नेमणूकीच्या पध्दतीस सोबत जोडलेल्या "परिशिष्ट-२, अनुसूची-अ" नुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५४, ४५५, ४५६, ४५७(३) व ४६५ अन्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या नियमास "कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१" चा सुधारित भाग असे संबोधण्यात यावे.

३. सदर सुधारित नियम, आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावेत. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

५. श्री. संदिप राऊत, यांचे कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून समावेशन करण्यात येत आहे:-

***अटी व शर्ती :-***

१) सदर कर्मचाऱ्याची सेवा शासन निर्णयाच्या दिनांकापासून कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या सेवेत कायम करण्यात यावी.
२) श्री. संदिप राऊत, यांना सेवेत कायम केल्याच्या दिनांकापासून पुढे सेवाज्येष्ठता, वेतन निवृत्तीवेतन इत्यादी लाभ अनुज्ञेय राहतील.
३) श्री. संदिप राऊत, यांना यापूर्वी केलेल्या सेवेचे कोणतेही लाभ अथवा थकबाकी अनुज्ञेय नसेल.
४) सेवेत कायम करण्यापूर्वी संबंधित कर्मचाऱ्याकडून बंधपत्र घेऊन मागील कोणताही लाभ मिळणार नाही, याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.
५) सदर कर्मचाऱ्याच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही शासन निधी मंजूर करता येणार नाही.
६) श्री. राऊत, यांचे महानगरपालिका सेवेत समावेशन करतांना एकवेळची बाब म्हणून ३५% आस्थापना खर्चाची अट शिथील करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०६०७१८०६०९९५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.06.12 17:58:10 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि.ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि २), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).

**शा.नि.क्र.कडोंम-१०१४/प्र.क्र.२४/नवि-२८, दि. ०७ जून, २०२३ सोबतचे "परिशिष्ट-२, अनुसूची-अ"**

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | सध्याची तरतूद | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सिटी प्रोग्राम मॅनेजर (आरोग्य सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा/ पदोन्नती | M.B.A. or M.B.A. in Hospital Administration or Master in Health Administration or Master in Public Health from reputed University or PGDHA at IIHMR, Jaypur. |

*************************************************